**<u>एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-६</u> राज्यसेवा (मुख्य) परिक्षा - २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, गट ब संवर्गातील उमेदवारांच्या परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधी करिता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत व त्यांच्या वेतनाबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कअस १३१९/प्र.क्र.६९/१४ब**
मंत्रालय, मुंबई - -४०० ०३२.
दिनांक: १४ नोव्हेंबर, २०१९

<u>संदर्भ:-</u>

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दिनांक २५.०९.२०१९
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दिनांक ३१.१०.२०१९

<u>प्रस्तावना:-</u>

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम -६ मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गातील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष रूजू झालेल्या १८ उमेदवारांकरिता सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतनस्तर <u>एस-१७ (४७६०० - १५११००)</u> मध्ये एकूण १८ अधिसंख्य पदे दिनांक ०२.१०.२०१९ ते ०३.१०.२०२१ या दोन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्याकरिता शासन मंजूरी देत आहे.

२. सदर १८ अधिसंख्य पदे सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गातील सदर १८ अधिसंख्य पदांच्या दिनांक ०२.१०.२०१९ ते ०३.१०.२०२१ या दोन वर्षांच्या कालावधीतील वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र.ए-४ २०५२- सचिवालय- सर्वसाधारण सेवा - ०१ वेतन (२०५२००२५)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक दिनांक २५.०९.२०१९ व ३१.१०.२०१९ अन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-६ (सीपीटीपी-६) साठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या असून परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थींच्या वेतनाबाबत निर्देश दिले आहेत. त्यानुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-६ (सीपीटीपी-६) अंतर्गत प्रशिक्षण घेणा-या मंत्रालयीन कक्ष अधिकारी - गट ब संवर्गातील १८ उमेदवारांच्या परिविक्षाधीन कालावधीतील वेतनासंदर्भात पुढीलप्रमाणे आदेशित करण्यात येत आहे:-

अ) सीपीटीपी -६ अंतर्गत प्रशिक्षण घेणा-या मंत्रालयीन कक्ष अधिकारी - गट ब संवर्गातील १८ प्रशिक्षणार्थी / परिविक्षाधीन उमेदवारांच्या वेतनासाठी अवर सचिव (कार्यासन - २६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

ब) उपरोक्त १८ परिविक्षाधीन कक्ष अधिकारी गट-ब हे दिनांक ०२.१०.२०१९ ते २२.०३.२०२० या २४ आठवड्यांच्या कालावधीत वनामती, नागपूर येथे प्रशिक्षण घेणार असून, सदर प्रशिक्षणार्थींना दिनांक ०२.१०.२०१९ ते २२.०३.२०२० या २४ आठवड्यांच्या कालावधीत द्यावयाच्या ठोक वेतनासाठी प्रति महिना प्रति अधिकारी रू.२०,०००/- याप्रमाणे एकत्रितरित्या अग्रिम निधी आहरण व संवितरण अधिकारी यांनी वनामती, नागपूर यांना उपलब्ध करून द्यावा.

क) परिविक्षाधीन कालावधीतील खातेनिहाय तांत्रिक प्रशिक्षण या टप्प्याचे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर (एकूण २४ आठवड्यानंतर) प्रशिक्षणार्थी/ परिविक्षाधीन कक्ष अधिकारी या विभागाकडे खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाच्या टप्प्यासाठी हजर झाल्यापासून या उमेदवारांना नियमित वेतन प्रदान करण्यात यावे. त्याचप्रमाणे आधीच्या २४ आठवड्यांच्या कालावधीत प्रशिक्षणार्थींना अदा करण्यात आलेली ठोक वेतनाची रक्कम आणि नियमित वेतन यामधील फरकाची रक्कम देखील एक रकमी अदा करण्यात यावी.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११४१६५६१४२९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.11.14 16:58:13 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
७. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. अवर सचिव( का. सीपीटीपी ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव( का. २६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. (आवश्यक कार्यवाहीकरिता)
११. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.
१२. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती.